**नागपूर विभागातील गडचिरोली, भंडारा, चंद्रपूर, गोंदिया व नागपूर जिल्हयांमध्ये सिंचन विहिरींचा धडक कार्यक्रम अंतर्गत अतिरिक्त १३००० सिंचन विहिरींचा लक्षांक व योजनेत वर्धा जिल्हयाचे समावेशन करणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**

**नियोजन विभाग (रोहयो)**

**शासन निर्णय क्रमांक : विहिर २०१७/प्र.क्र.९८/मग्रारो-५**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२,

दिनांक - ०६ फेब्रुवारी, २०१९.

वाचा :- १) नियोजन विभाग शासन निर्णय क्रमांक : विहिर-२०१६/प्र. क्र. ३१/रोहयो-५, दिनांक ११ सप्टेंबर, २०१६.

२) नियोजन विभाग शासन पत्र क्रमांक : विहिर-२०१६/प्र.क्र.४/मग्रारो-५, दिनांक ७ जानेवारी, २०१७.

३) विभागीय आयुक्त नागपूर विभाग, नागपूर यांचे पत्र क्रमांक : रोहयो/ सि.वि./ अका-३/ कावि-६३५/२०१८, दिनांक १८ सप्टेंबर, २०१८.

४) नियोजन विभाग शासन निर्णय क्रमांक : विहीर-२०१६/प्र. क्र. ३१/रोहयो-५, दिनांक १ नोव्हेंबर, २०१८.

**प्रस्तावना-**

नागपूर विभागातील गडचिरोली, भंडारा, चंद्रपूर, गोंदिया व नागपूर या जिल्हयांत भूगर्भात पाण्याची अधिक उपलब्धता असूनही विहिरींची संख्या कमी असल्याने सिंचनाची सुविधा कमी प्रमाणात उपलब्ध असल्याचे निदर्शनास आल्याने, उपलब्ध पाण्याची पातळी विचारात घेता विभागाच्या संदर्भाधीन अ.क्र. १ येथे नमूद दिनांक ११ सप्टेंबर, २०१६ च्या शासन निर्णयान्वये नागपूर विभागात (वर्धा जिल्हा वगळून) ११००० विहिरींचा धडक कार्यक्रम सुरु करण्यात आला. सदर कार्यक्रमांतर्गत जिल्हानिहाय विहिरींचा लक्षांक देण्यात आला. तद्नंतर संदर्भाधीन अ.क्र. २ येथे नमूद दिनांक ७ जानेवारी, २०१७ च्या पत्रान्वये चंद्रपूर जिल्हयास ६१४ विहिरींचा अतिरिक्त लक्षांक मंजूर करण्यात आला आहे. त्यामुळे सदर योजनेचा एकूण लक्षांक सद्य:स्थितीत ११६१४ इतका झाला आहे. या कार्यक्रमांतर्गत आतापर्यंत ८७७५ इतक्या विहिरी पूर्ण झाल्या असून, २७३४ विहिरींची कामे प्रगतीपथावर आहेत.

दरम्यान मध्यप्रदेशातील चौराई धरणामुळे महाराष्ट्रातील पेंच प्रकल्पाच्या पाणी साठयात व सिंचनाचा घटीचा परिणाम व त्यादृष्टीने करावयाच्या अल्पकालीन उपाययोजनांबाबत मंत्रिमंडळाच्या दिनांक २२.३.२०१८ च्या बैठकीत झालेल्या चर्चेच्या अनुषंगाने पेंच प्रकल्पाच्या लाभक्षेत्रात विहीरी घेणे प्रस्तावित आहे.

तद्नंतर नागपूर येथे झालेल्या विधानमंडळाच्या जुलै, २०१८ च्या पावसाळी अधिवेशनामध्ये विदर्भातील जिल्हयांच्या आढाव्यादरम्यान नागपूर विभागात सिंचन विहिरी कार्यक्रमास मिळालेला प्रतिसाद व नागपूर

विभागात अतिरिक्त सिंचन विहिरी मंजूर करण्यास असणारा वाव लक्षात घेता मा. मुख्यमंत्री महोदयांनी नागपूर विभागासाठी सुरु असलेल्या ११६१४ विहिरींच्या धडक कार्यक्रमांतर्गत अतिरिक्त १०००० विहिरींचा कार्यक्रम घेण्यात येईल व वर्धा जिल्हयास सिंचन विहिर योजनेमध्ये लक्षांक देण्याबाबत लोकप्रतिनिधींनी केलेली मागणी विचारात घेऊन वर्धा जिल्हयांचा योजनेत समावेश करुन लक्षांक देण्यात येईल असे जाहिर केले आहे.

मध्यप्रदेशातील चौराई धरणामुळे महाराष्ट्रातील पेंच प्रकल्पाच्या पाणी साठयात व सिंचनाचा घटीचा परिणाम व त्यादृष्टीने करावयाच्या अल्पकालीन उपाययोजनांबाबत मंत्रिमंडळाच्या दिनांक २२.३.२०१८ च्या बैठकीत झालेल्या चर्चेनुसार व मा. मुख्यमंत्री महोदयांनी दिलेल्या निर्देशानुसार विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर यांच्याकडून संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांच्या अभिप्रायासह प्रस्ताव मागविण्यात आला. त्यानुसार विभागीय आयुक्त नागपूर विभाग, नागपूर यांनी संदर्भाधीन अ.क्र. ३ येथे नमूद दिनांक १३.९.२०१८ च्या पत्रान्वये नागपूर विभागासाठी पहिल्या टप्प्यात १०००० विहीरी व दुस-या टप्प्यात ३००० विहीरी अशाप्रकरारे एकूण १३००० विहीरींचा लक्षांक प्रस्तावित केला आहे. त्यास अनुसरुन खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**<u>शासन निर्णय</u>** -

१. नागपूर विभागात घेण्यात आलेल्या ११६१४ सिंचन विहीरींच्या धडक कार्यक्रमांतर्गत सन २०१९-२० मधील पहिल्या टप्प्यात १०००० विहीरी व सन २०२०-२१ मधील दुस-या टप्प्यात ३००० विहीरी अशाप्रकारे १३००० विहीरींचा अतिरिक्त जिल्हानिहाय लक्षांक मंजूर करण्यात येत असून, तो खालीलप्रमाणे आहे:-

| **अ.क्र.** | **जिल्हा** | | **प्रस्तावित विहीरींचा लक्षांक** | **पहिल्या टप्प्यात विहीरींचा लक्षांक (२०१९-२०)** | **दुस-या टप्प्यात विहीरींचा लक्षांक (२०२०-२१)** |
|---|---|---|---|---|---|
| १ | नागपूर | पेंच लाभक्षेत्र | ४५०० | १५०० | ३००० |
| | | इतर क्षेत्र | ५०० | ५०० | -- |
| | | **एकूण** | **५०००** | **२०००** | **३०००** |
| २ | भंडारा | पेंच लाभक्षेत्र | ८०० | ८०० | -- |
| | | इतर क्षेत्र | ७०० | ७०० | -- |
| | | **एकूण** | **१५००** | **१५००** | **--** |
| ३ | गोंदिया | | ११०० | ११०० | -- |
| ४ | चंद्रपूर | | १७०० | १७०० | -- |
| ५ | गडचिरोली | | १७०० | १७०० | -- |
| ६ | वर्धा | | २००० | २००० | -- |
| **एकूण** | | | **१३०००** | **१००००** | **३०००** |

२. सदर योजनेमध्ये वर्धा जिल्हयाचा नव्याने समावेश करण्यात येत आहे.

३. नागपूर विभागातील गडचिरोली, भंडारा, चंद्रपूर, गोंदिया व नागपूर जिल्हयांमधील **“सिंचन विहिरींचा धडक कार्यक्रम”** योजनेस दिनांक ३० जून, २०२० पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

४. दुष्काळी तालुक्यांना प्राधान्य देण्यात यावे.

५. नागपूर विभागातील सिंचन विहिर कार्यक्रमांतर्गत देण्यात आलेल्या अतिरिक्त १३००० सिंचन विहिरींचा लक्षांक साध्य होण्यासाठी अंदाजे रू ३२५ कोटी इतका खर्च अपेक्षित आहे. याव्यतिरिक्त प्रशासकीय खर्चासाठी योजनेच्या खर्चाच्या ४% इतका म्हणजेच रु. १३ कोटी असा एकूण रु. ३३८ कोटी इतका निधी सन २०१९-२० व २०२०-२१ या वित्तीय वर्षात **मागणी क्रमांक “ओ-३, मुख्य लेखाशीर्ष २५०५, ग्रामीण रोजगार हमी योजना व ०२, ग्रामीण रोजगार हमी योजना १०१, महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना (०१)(०९), दुष्काळ प्रतिबंधक उपाययोजना अंतर्गत विहिरी तयार करणे” (२५०५ ए ०४९) ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर),”** या उपशिर्षाखाली नियतव्यय व अर्थसंकल्पीय अनुदान उपलब्ध करुन देण्यात येईल.

६. नियोजन विभागाच्या संदर्भाधीन अ.क्र. १ येथे नमूद दिनांक ११ सप्टेंबर, २०१६ च्या शासन निर्णयामधील सर्व अटी व शर्ती बंधनकारक राहतील.

सदर शासन निर्णय, नियोजन विभागाच्या मान्यतेने व वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक १४९/२०१८/व्यय-८, दिनांक १४.१२.२०१८ अन्वये देण्यात आलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१९०२०७१२४९३३०४१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dr. Pramod Sopan Shinde

Digitally signed by Dr. Pramod Sopan Shinde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=86df3b89584863ae114ab9dcc19318acf0e1e94714d4f3f2196a35403313b298, cn=Dr. Pramod Sopan Shinde
Date: 2019.02.07 12:51:54 +05'30'

**( डॉ. प्रमोद शिंदे )**
**उप सचिव (रोहयो)**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव.
२) मा. मुख्यमंत्री यांचे सचिव.
३) मा. मंत्री (रोहयो) यांचे खाजगी सचिव.
४) सर्व मा. मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
५) मा. विरोधी पक्षनेता विधान सभा/विधान परिषद यांचे स्वीय सहाय्यक.
६) मा. समिती प्रमुख, महाराष्ट्र विधानमंडळ रोहयो समिती, विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
७) मा. मुख्य सचिव यांचे सह सचिव.
८) सर्व अप्पर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, मंत्रालयीन विभाग.

९) विभागीय आयुक्त नागपूर विभाग, नागपूर.

१०) जिल्हाधिकारी नागपूर / भंडारा/ गोंदिया/ चंद्रपूर/ गडचिरोली/ वर्धा.

११) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद नागपूर / भंडारा/ गोंदिया/ चंद्रपूर/ गडचिरोली/ वर्धा.

१२) प्रादेशिक उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, नागपूर विभाग, नागपूर

१३) अधीक्षक अभियंता, पाटबंधारे/ अधीक्षक अभियंता, लघु पाटबंधारे (स्थानिक स्तर), नागपूर/ भंडारा/ गोंदिया/ चंद्रपूर/ गडचिरोली/ वर्धा .

१४) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय/ महासंचालक, माहिती व जनसंपर्क, मुंबई (प्रसिध्दीकरीता)

१५) उपायुक्त (विकास), नागपूर / भंडारा/ गोंदिया/ चंद्रपूर/ गडचिरोली/ वर्धा.

१६) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १ व २, मुंबई व नागपूर.

१७) प्रधान महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र १ व २, मुंबई व नागपूर.

१८) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर / भंडारा/ गोंदिया/ चंद्रपूर/ गडचिरोली/ वर्धा

१९) सर्व उप सचिव/ अवर सचिव/कक्ष अधिकारी नियोजन विभाग (रोहयो)

२०) सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.

२१) निवड नस्ती रोहयो-५.